**परिवहन विभागातील सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी (गट-अ) व मोटार वाहन निरीक्षक (गट-ब) संवर्गातील अधिकाऱ्यांचे वयाच्या ५०/५५ व्या वर्षानंतर सेवा पुनर्विलोकन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: एमव्हीडी-१०२०/प्र.क्र.२३२/परि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : २१ ऑगस्ट, २०२४.

**वाचा** -

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. एलपीएल-२०१७/प्र.क्र.२१/का.पंधरा, दि.१०.०६.२०१९.
२) गृह विभाग, शासन निर्णय क्र. एमव्हीडी-०७१९/प्र.क्र. १७१/परि-४, दि. ०२.०८.२०१९.
३) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. पआका/कार्या ८ (२)/ ५०-५५/ सेवा पुनर्विलाकन/ मोवानि व सहा. प्रापअ पदोन्नती/२०२३/जा.क्र. ११०१६, दि. १४.०९.२०२३.

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ च्या नियम १० (४) व नियम ६२ नुसार सार्वजनिक हितास्तव अकार्यक्षम व संशयास्पद सचोटीच्या अधिकारी/ कर्मचाऱ्यांना वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्षे अर्हताकारी सेवा यापैकी जे अगोदर घडेल त्यावेळी त्यांचे सेवा पुनर्विलोकन करुन त्यांना शासन सेवेतून मुदतपूर्व सेवानिवृत्त करावे असे शासनाचे धोरण आहे. त्या अनुषंगाने सामान्य प्रशासन विभागाने उपर्निर्दिष्ट क्र. १ येथील शासन निर्णयान्वये सेवा पुनर्विलोकनासंबंधी कार्यपद्धती व सर्वसाधारण सूचना विहित केल्या आहेत. त्यास अनुसरुन परिवहन विभागातील १) गट-अ (राजपत्रित) (वरिष्ठ वेतनश्रेणी) ग्रेड वेतन रु. ७६००/- व त्यापेक्षा अधिक परंतु रु.१००००/- पेक्षा कमी संवर्गातील अधिकारी २) गट-अ (राजपत्रित) (कनिष्ठ वेतनश्रेणी) ग्रेड वेतन रु.७६००/- पेक्षा कमी संवर्गातील अधिकारी तसेच गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिकारी यांच्या सेवा पुनर्विलोकनाकरिता उपर्निर्दिष्ट क्र. २ येथील दि.०२.०८.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये अपर मुख्य सचिव (परिवहन) यांचे अध्यक्षतेखाली विभागीय पुनर्विलोकन समितीची स्थापना करण्यात आली आहे.

२. परिवहन विभागातील सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी, गट-अ व मोटार वाहन निरीक्षक, गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्षे अर्हताकारी सेवा यापैकी जे आगोदर घडेल त्यावेळी त्यांचे सेवा पुनर्विलोकन करण्यासाठीचा विहित प्रस्ताव अपर मुख्य सचिव (परिवहन) यांचे अध्यक्षतेखालील विभागीय पुनर्विलोकन समितीच्या दिनांक २४.०७.२०२४ रोजीच्या

बैठकीत सादर करण्यात आला. विभागीय पुनर्विलोकन समितीने सदर अधिकाऱ्यांच्या सेवेचे मुल्यमापन करुन केलेल्या शिफारशीनुसार ज्या अधिकाऱ्यांना वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्षे अर्हताकारी सेवा यापैकी जे अगोदर घडेल त्यावेळी सेवेत राहण्यासाठी पात्र ठरविले आहे, त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> -**

विभागीय पूनर्विलोकन समितीच्या दिनांक २४.०७.२०२४ रोजी झालेल्या बैठकीतील शिफारशीस अनुसरुन परिवहन विभागातील सोबतच्या प्रपत्र-अ मधील सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी, गट-अ व मोटार वाहन निरीक्षक, गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्षे अर्हताकारी सेवा यापैकी जे अगोदर घडेल त्यानंतर चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सोबतच्या प्रपत्र-अ मध्ये नमूद सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी व मोटार वाहन निरीक्षक या अधिकाऱ्यांची सेवा ५०/५५ वर्षानंतर किंवा अर्हताकारी सेवेची ३० वर्षे पूर्ण झाल्यानंतर पुढे चालू ठेवण्यास मान्यता मिळाल्याबाबतची नोंद त्यांच्या सेवापुस्तकात घेण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८२११११५२२४४७२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL BABURAO APATE

Digitally signed by SUNIL BABURAO APATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=19ff433c24f38ac95f09eaa0a14f560224a1a78a80f8b940775fc013021ca5ca, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4EA86DEC92091A126823D249DF451DF3C8D235CDD7E9111D7624C78A7C95B318, cn=SUNIL BABURAO APATE
Date: 2024.08.21 12:07:04 +05'30'

**( सु. बा. आपटे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), १/२, मुंबई/नागपूर.
२. महालेखापाल (लेखापरीक्षा), १/२, मुंबई/नागपूर
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई/नागपूर.
४. अपर मुख्य सचिव,गृह (परिवहन) विभाग,मंत्रालय यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
५. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. सह परिवहन आयुक्त (प्रशासन), परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई.
७. संबंधित सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी/मोटार वाहन निरीक्षक (परिवहन आयुक्त यांचेमार्फत)
८. निवडनस्ती, परि-४.

# प्रपत्र-अ

**शासन निर्णय क्रमांक एमव्हीडी-१०२०/प्र.क्र.२३२/परि-४, दिनांक २१.०८.२०२४ सोबतचे प्रपत्र परिवहन विभागातील गट-अ व गट-ब संवर्गातील वयाच्या ५०/५५ वर्षानंतर किंवा अर्हताकारी सेवेची ३० वर्षे पूर्ण झालेनंतर सेवा पुढे चालू ठेवण्यास पात्र ठरलेल्या अधिकाऱ्यांची यादी.**

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | पदनाम |
|---|---|---|
| १ | श्री. सुधीर दिनकरराव जायभाये | सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी |
| २ | श्री. मनोज गजानन ओतारी | सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी |
| ३ | श्री. असिफ चाँदसो मुलाणी | मोटार वाहन निरीक्षक |
| ४ | श्री. अविनाश विजयराव दुसाने | मोटार वाहन निरीक्षक |
| ५ | श्री. चंद्रकांत प्रभाकर माने | मोटार वाहन निरीक्षक |
| ६ | श्री. पद्माकर गोरक्षनाथ पाटील | मोटार वाहन निरीक्षक |
| ७ | श्री. सचिंद्रकुमार अमरचंद राठोर | मोटार वाहन निरीक्षक |

*****